**निवृत्ती वेतनधारकांना ओळखपत्र देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक : संकीर्ण २०१६ / प्र. क्र. १८३ / १८ ( र. व का .)**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- २३ फेब्रुवारी, २०१७.

**वाचा** : शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक : संकीर्ण १०९९ / १२२० / १८ (र. व का.), दिनांक २८ जुलै, २०००.

**शासन परिपत्रक :-**

शासकीय अधिकारी / कर्मचारी यांना त्यांच्या सेवानिवृत्तीनंतर मिळणाऱ्या लाभांसाठी संबंधित कार्यालयात ये-जा करण्यासाठी सेवानिवृत्तीनंतर एका वर्षाच्या कालावधीसाठी ओळखपत्र देण्याबाबत दिनांक २८ जुलै, २००० च्या परिपत्रकान्वये सूचना देण्यात आलेल्या आहेत. सेवानिवृत्तीनंतर निवृत्तीवेतनाबाबतची कार्यवाही विहित मुदतीत व्हावी, शासकीय रुग्णालयातील औषधोपचार, ज्येष्ठ नागरीक म्हणून रेल्वे, बँका इ. ठिकाणी उपयोग करण्यासाठी तसेच शासकीय सेवानिवृत्त अधिकारी / कर्मचारी म्हणून त्यांना समाजात सन्मानाची वागणूक मिळण्याच्यादृष्टीने उपरोक्त दिनांक २८ जुलै, २००० चे परिपत्रक अधिक्रमित करून त्यांना कायमस्वरुपी ओळखपत्र देण्यासाठी सुधारित परिपत्रक निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

२. याबाबत शासनाने असा निर्णय घेतला आहे की, शासकीय अधिकारी / कर्मचारी ज्या पदावरुन सेवानिवृत्त झाले आहेत ते पद नमूद करून संबंधित प्रशासकीय कार्यालय / विभागाने त्यांना कायमस्वरुपी फोटोसह ओळखपत्र देण्याची कार्यवाही करावी. पदनाम नमूद करताना त्याआधी **"सेवानिवृत्त"** असा उल्लेख न चुकता करावा. तसेच सदर ओळखपत्र देण्यापूर्वी संबंधित अधिकारी / कर्मचारी यांनी त्यांचे शासन सेवेत असतानाचे ओळखपत्र शासनाकडे जमा केलेले आहे, याची खातरजमा करण्यात यावी. तसेच या प्रयोजनासाठी येणारा खर्च प्रशासकीय विभागांनी मंजूर अनुदानातून भागवावा.

३. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेताक २०१७०३०११६१६२४७००७ असा आहे. तसेच डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावांने.

Santosh Vithal Rokade

Digitally signed by Santosh Vithal Rokade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=GAD, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ca5751ffedbb005fdff34ab6ac1f8319d06148 3d7d35e20f744e251360f7920a, cn=Santosh Vithal Rokade
Date: 2017.03.01 16:21:44 +05'30'

**( संतोष रोकडे )**
**शासनाचे अवर सचिव**

**प्रति,**

१. मा. राज्यपालांचे सचिव ( ५ प्रती ) (पत्राने),
२. मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव ( ५ प्रती ), मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,

३. सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
४. मा.विरोधी पक्षनेता, विधान परिषद/ विधान सभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
५. सर्व सन्माननीय संसद सदस्य, विधानसभा व विधानपरिषद सदस्य,
६. सचिव, राज्य निवडणूक आयोग, मुंबई, ( पत्राने ),
७. मा.मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
८. मा. महाअधिवक्ता, मा. उच्च न्यायालय,महाराष्ट्र राज्य, मुंबई,
९. प्रधान महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता ) -१, महाराष्ट्र, मुंबई,
१०. प्रधान महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता ) -२, महाराष्ट्र, नागपूर,
११. प्रधान महालेखापाल ( लेखापरीक्षा ) -१, महाराष्ट्र, मुंबई,
१२. प्रधान महालेखापाल ( लेखापरीक्षा ) -२, महाराष्ट्र, नागपूर,
१३. सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव,मंत्रालयीन प्रशासकीय विभाग,
१४. महाप्रबंधक, मा. मुंबई उच्च न्यायालय, मुंबई,
१५. प्रबंधक, मुंबई उच्च न्यायालय ( मूळ शाखा ), मुंबई,
१६. प्रबंधक, मा. लोकायुक्त व मा. उप लोकायुक्त यांचे कार्यालय, नवीन प्रशासन भवन, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई,
१७. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई, ( पत्राने ),
१८. प्रधान सचिव, विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई,
१९. मा.मुख्य माहिती आयुक्त, राज्य माहिती आयोग, मुंबई,
२०. सर्व विभागीय आयुक्त,
२१. सर्व जिल्हाधिकारी,
२२. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
२३. सर्व मंत्रालयीन विभागांच्या अधिपत्याखालील सर्व विभाग प्रमुख /
२४. प्रादेशिक प्रमुख / कार्यालय प्रमुख,
२५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
२६. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई,
२७. कक्ष अधिकारी, कार्यासन अर्थ-१/व्यय-४/विसु.१, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई ४०००३२,
२८. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई,
२९. सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने, मंत्रालय, मुंबई ४०००३२,
३०. निवड नस्ती ( कार्यासन १८ ), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.